परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी (गट-अ) यांचे प्रशिक्षणाकरीता ११ तहसिलदारांची अधिसंख्य पदे ६ महिन्याकरीता निर्माण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१३ /प्र.क्र.२६१/ई-८,**
३२ वा मजला, सेंटर-१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई- ४०० ००५.
तारीख: १४ नोव्हेंबर, २०१४.

**वाचा:-**

१. महसूल व वन विभाग, शा.आ.क्रमांक-आरसीटी-०६१३/प्र.क्र.१८३/ई-२, दि. २१/४/२०१४.
२. वित्त विभाग शा.नि. क्र. पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दि. ११/७/२०१२.
३. महसूल व वन विभाग, शा. नि. क्रमांक-ईएसटी-२०१३/प्र.क्र.२६१/ई-८, दि. १५/०५/२०१४.

**शासन निर्णय:-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा, २०१२ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उपजिल्हाधिकारी (गट-अ) संवर्गातील ४२ उमेदवारांची नियुक्ती उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन आदेशान्वये करण्यात आलेली आहे. सदर ४२ उपजिल्हाधिकारी ( गट-अ ) पदांसाठी खाली नमुद केलेल्या महसूली विभागाच्या आस्थापनेवर उपजिल्हाधिकारी ( गट-अ ) संवर्गात रुपये १५६००-३९१०० ( ग्रेड पे रु. ५४००/- ) या वेतनश्रेणीतील संबंधित अधिका-यांनी पदाचा कार्यभार स्वीकारल्याच्या दिनांकापासून दोन वर्षासाठी ४२ उपजिल्हाधिकाऱ्यांची अधिसंख्य पदे निर्माण करण्यास दिनांक १५/०५/२०१४ च्या शासन निर्णयान्वये शासन मंजूरी देण्यात आली आहे. सदर उपजिल्हाधिका-यांना तहसिलदार पदाचा प्रत्यक्ष अनुभव देण्याचा प्रशिक्षणाचा भाग आहे. तथापि, औरंगाबाद महसूल विभागांतर्गत तहसिलदार या संवर्गाची पदे रिक्त नसल्यामुळे परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी, "गट-अ" यांचे प्रशिक्षणाकरीता ११ तहसिलदारांची अधिसंख्य पदे ६ महिन्यांच्या कालावधीकरीता निर्माण करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२.	शासनाने वेळोवळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त ११ परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३.	सदर ११ परिविक्षाधीन तहसिलदारांची पदे ही परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी "गट-अ" यांच्या प्रशिक्षण कालावधीतील केवळ ६ महिन्याकरीता निर्माण करण्यात आली आहेत.

४.	हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दि. ११/७/२०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११४१०५४४७१०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.11.14 16:32:46 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
२) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
४) प्रधान महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर.
५) कक्ष अधिकारी, व्यय-९/वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी, ब-१ / ई-२, महसूल व वन विभाग, कफ परेड , मुंबई - ४०० ००५.
७) निवड नस्ती, कार्यासन -ई-८, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई- ०५.